**ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांसाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मराग्र २०२३/प्र.क्र.५४/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ मार्च, २०२३.

**संदर्भ** : १) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्र. वेपुर-११२२/प्र.क्र.२०/सुधारणा-२८/सेवा-९, दिनांक २४.११.२०२२.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं-२५१५/प्र.क्र.३५/साशि-५, दिनांक १६.१२.२०२२.
३) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ११/२०२२-२३/१६२७२, दिनांक ०१.०३.२०२३

**प्रस्तावना** :

शासकीय विभागीय ग्रंथालय, अमरावती/औरंगाबाद/नाशिक/रत्नागिरी व डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मृती ग्रंथालय, दापोली या कार्यालयांमध्ये “ग्रंथपाल, गट-ब” हे कार्यालय प्रमुखाचे पद होते. वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक २४.११.२०२२ रोजीच्या अधिसूचनेन्वये ग्रंथालय संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-ब संवर्गातील “हस्तलिखित अधिकारी” व “ग्रंथपाल, गट-ब” ही पदनामे वगळून “जिल्हा ग्रंथालय अधिकारी” या पदनामाचा समावेश करण्यात आला आहे. तसेच, विदर्भातील नागपूर/भंडारा/चंद्रपूर/यवतमाळ/वर्धा/अकोला व बुलढाणा या ७ जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयांचे कामकाज जिल्हा ग्रंथपाल (गट-क, अराजपत्रित) या कर्मचाऱ्यांमार्फत चालविण्यात येत होते. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक १६.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये ग्रंथालय संचालनालयाच्या सुधारित आकृतीबंधातील “जिल्हा ग्रंथपाल” (गट-क, अराजपत्रित) या संवर्गातील ७ पदे रद्द करुन त्या ऐवजी “जिल्हा ग्रंथालय अधिकारी” (गट-ब, राजपत्रित) या संवर्गात ७ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

यानुषंगाने जिल्हा ग्रंथालय अधिकारी, शासकीय विभागीय ग्रंथालय अमरावती/औरंगाबाद/नाशिक/रत्नागिरी व जिल्हा ग्रंथालय अधिकारी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मृती ग्रंथालय, दापोली तसेच जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, नागपूर/भंडारा/चंद्रपूर/यवतमाळ/वर्धा/अकोला व बुलढाणा यांना संबंधित कार्यालयाकरीता “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा ग्रंथालय अधिकारी, शासकीय विभागीय ग्रंथालय अमरावती/औरंगाबाद/नाशिक/रत्नागिरी व जिल्हा ग्रंथालय अधिकारी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मृती ग्रंथालय, दापोली तसेच जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय,

नागपूर/भंडारा/चंद्रपूर/यवतमाळ/वर्धा/अकोला व बुलढाणा यांना संबंधित कार्यालयाकरीता “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८, नियम क्र.१५६ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३०८१५४५००३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JAYSHREE
JAIDEEP PAWAR

Digitally signed by JAYSHREE JAIDEEP PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=eeee44fcf7845b901705e43c61fae6d16c0e7b7698582371dc04a8046ee34aa5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6C5D55F6A42AE35A44BE91403E6042C0F36CCB7FBD97F8AEDC0F4AA2E3399FF1, cn=JAYSHREE JAIDEEP PAWAR
Date: 2023.03.08 15:48:33 +05'30'

**(जयश्री ज. पवार )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), मुंबई/नागपूर
३. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. ग्रंथालय संचालनालयाच्या अधिनस्त सर्व कार्यालये (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. निवड नस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.